पुनरिक्षण समिती व विभागीय शुल्क नियामक समिती वरील अध्यक्ष व अशासकीय सदस्यांना मानधन अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाशैशु-२०१९/प्र.क्र.५७/एसएम-६**
मादाम कामा रोड, मंत्रालय, विस्तार भवन,
मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २० डिसेंबर, २०२१

वाचा :-

१) शासन अधिसूचना, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक शाशैशु-२०१९/प्र.क्र.५७/एसएम-६, दिनांक २० फेब्रुवारी, २०२१

२) शासन अधिसूचना, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक शाशैशु-२०१९/प्र.क्र.५७/एसएम-६, दिनांक ७ जून, २०२१

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन) अधिनियम २०११ च्या कलम ७ व ११ नुसार दिनांक २०.०२.२०२१ रोजीच्या अधिसूचनेद्वारे पुनरिक्षण समिती तसेच दिनांक ७.६.२०२१ रोजीच्या अधिसूचनेद्वारे विभागीय शुल्क नियामक समित्या गठीत करण्यात आल्या आहेत. सदर समिती वरील अध्यक्ष व अशासकीय सदस्यांना प्रतिबैठक प्रतिदिन या दराने मानधन अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन) अधिनियम २०११ च्या कलम ७ व ११ नुसार गठीत पुनरिक्षण समिती व विभागीय शुल्क नियामक समितीवरील अध्यक्ष व अशासकीय सदस्यांना प्रतिबैठक प्रतिदिन पुढीलप्रमाणे मानधन अदा करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

| पद | प्रति बैठक (प्रति दिन मानधन) (प्रत्यक्ष उपस्थिती) | प्रति बैठक (प्रति दिन मानधन) (दूरदृष्यप्रणालीद्वारे) | प्रति बैठक (प्रति दिन मानधन ) ( प्रभावीपणे पूर्ण न झालेली बैठक) | मासिक कमाल मर्यादा (मानधन) | मासिक कमाल मर्यादा (एकत्रित भत्ता) |
|---|---|---|---|---|---|
| अध्यक्ष, पुनरिक्षण समिती (सेवानिवृत्त न्यायाधीश उच्च न्यायालय) | ८,०००/- | ३,०००/- | १,५००/- | ८०,०००/- | ४०,०००/- |
| सदस्य, पुनर्रिक्षण समिती (सनदी लेखापाल) | ३,०००/- | १,२००/- | १,०००/- | ३०,०००/- | १५,०००/- |
| सदस्य पुनरिक्षण समिती, (शिक्षण संचालक किंवा समकक्ष पदावरील सेवानिवृत्त प्रमुख | ३,०००/- | १,२००/- | १,०००/- | ३०,०००/- | १५,०००/- |
| अध्यक्ष, विभागीय शुल्क नियामक समिती (सेवानिवृत्त जिल्हा न्यायाधीश) | ६,०००/- | २,५००/- | १,५००/- | ६०,०००/- | २५,०००/- |
| सदस्य विभागीय शुल्क नियामक समिती (सनदी लेखापाल) | ३,०००/- | १,२००/- | १,०००/- | ३०,०००/- | १५,०००/- |
| सदस्य विभागीय शुल्क नियामक समिती, (शिक्षण सहसंचालक या दर्जाहून कमी दर्जा नसलेला सेवानिवृत्त अधिकारी) | ३,०००/- | १,२००/- | १,०००/- | ३०,०००/- | १५,०००/- |

१) पुनरिक्षण समितीने एक प्रकरण जास्तीत जास्त दोन बैठकीत निकाली काढण्याचा प्रयत्न करावा.

२) विभागीय शुल्क समितीने एक प्रकरण जास्तीत जास्त तीन बैठकीत निकाली काढण्याचा प्रयत्न करावा.

३) उक्त नमुद मानधन व एकत्रित भत्त्याव्यतिरीक्त समिती अध्यक्ष व अशासकीय सदस्यांना शासनाकडून अन्य कोणतेही आर्थिक लाभ अनुज्ञेय असणार नाहीत.

०३. सदरचा खर्च मागणी क्रमांक ई-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ८०- सर्वसाधारण शिक्षण, ००१-संचालन व प्रशासन, (०१) शुल्क निर्धारण समिती, (०१)(०१) महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन) अधिनियम, २०११ अंतर्गत शुल्क निर्धारण समिती (२२०२।४६१) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २३१/सेवा-६, दिनांक २१.१०.२०२१ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेताक २०२११२२०१३३२२४५८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2021.12.21 13:01:07 +05'30'

**( इ. मु. काझी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) अध्यक्ष/सदस्य, पुनरिक्षण समिती (शिक्षण सह संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),शिक्षण संचालनालय यांचे मार्फत)
६) अध्यक्ष/सदस्य, विभागीय शुल्क नियामक समिती (विभागीय शिक्षण उप संचालक यांचे मार्फत)
७) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त,शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) महालेखापाल, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/पुणे/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/कोल्हापूर/अमरावती/लातूर
१६) शिक्षण सहसंचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), संचालनालय तथा पदसिध्द सदस्य सचिव, पुनरिक्षण समिती, महाराष्ट्र राज्य.

१७) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक तथा पदसिध्द सदस्य सचिव, विभागीय शुल्क नियामक समिती, महाराष्ट्र राज्य.

१८) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थसंकल्प-८/सेवा-५/सेवा-६, मंत्रालय, मुंबई.

१९) अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२०) निवड नस्ती (एस एम -६).